**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील संचालक ( माहिती ) (माध्यम समन्वय ) हे पद उपसंचालक ( माहिती ) या मूळ पदात रुपांतरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. मावज २०१८/प्र.क्र.१२५/का.३४अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ९ ऑगस्ट, २०१८

संदर्भ (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. मावज-२०१६/प्र.क्र.१२५/का.३४-अ, दि. १.१०.२०१६
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. मावज-२०१८/प्र.क्र.१२४/का.३४-अ, दि. ३०.७.२०१८

**शासन निर्णय :**

तंत्रज्ञानाचा वाढता वापर, वृत्त वाहिन्यांची वाढती संख्या या बाबींचा विचार करुन प्रसारमाध्यमांवर योग्य नियंत्रण ठेवण्याकरीता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या मुख्यालयामध्ये नियंत्रण कक्ष उभारण्यासाठी तसेच मा. मुख्यमंत्री, सचिव इ. वरिष्ठ अधिकारी यांच्या मुलाखती व शासकीय योजनांसदर्भातील देण्यात येणारी माहिती इत्यादीसाठी मंत्रालयामध्ये अद्ययावत स्टुडिओ उभारण्यासाठीचा प्रकल्प कार्यन्वित करणे इ. साठी महासंचालनालयातील उपसंचालक ( माहिती) ( प्रशासन ) हे १ पदसंदर्भाधीन शासन निर्णयान्वये दोन वर्षासाठी श्रेणीवाढ करुन ते संचालक ( माहिती) ( माध्यम समन्वय ) असे करण्यात आले आहे.

२. मागील दोन वर्षामध्ये मंत्रालयामध्ये अद्ययावत स्टुडिओची उभारणी व प्रसारमाध्यमे नियंत्रण कक्ष ( Media Monitoring Centre ) हे प्रकल्प पूर्ण करण्यात आले आहेत. तसेच संदर्भाधीन दिनांक ३० जुलै,२०१८ च्या शासन आदेशान्वये संचालक ( माहिती ) ( माध्यम समन्वय ) या पदावरील संचालकांची पदस्थापना संचालक ( माहिती) (वृत व जनसंपर्क ) या पदावर करण्यात करण्यात आली आहे. या बाबींचा विचार करुन मुख्यालयामध्ये रिक्त असलेले संचालक (माहिती ) ( माध्यम समन्वय ) ( वेतनश्रेणी रु. १५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००) हे पद या आदेशाच्या दिनांकापासून श्रेणी अवनत करुन ते उपसंचालक ( माहिती ) ( प्रशासन ) ( वेतनश्रेणी रु. १५६००-३९१००ग्रेड वेतन ६६००) या मूळ पदात रुपांतरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६३/२०१८/सेवा-९,दि. ३.८.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०९१५२५०५९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2018.08.09 15:28:05 +05'30'

**( रा.ना. मुसळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सचिव (मावज), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा परीक्षा), मुंबई,

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
६. संचालक( माहिती) ( प्रशासन ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. उपसंचालक ( माहिती) ( प्रशासन ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. सर्व विभागीय माहिती कार्यालये,
९. सर्व जिल्हा माहिती कार्यालये,
१०. उपसंचालक ( लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
११. वित्त विभाग / कार्यासन सेवा-९,
१२. सा.प्र.वि. / कार्यासन ३४,
१३. निवड नस्ती.